पाच हजार वर्षांपूर्वी ब्रिटनमध्ये पाषाण युगातील लोक राहात होते. हे लोक गुहेत राहात आणि मृत प्राण्यांच्या कातड्यापासून बनलेले कपडे अंगावर घालत. ते धारदार हत्यारांनी शिकार करत.

त्याच काळात दूर इजिप्तमध्ये लोक मोठ्या शहरांमध्ये राहात. ते भव्य मंदिरे उभारत, उंची कपडे व अलंकार घालत, व्यापारधंदा करत, घोड्यांवर स्वार होऊन लढाईवर जात, न्यायदान व्यवस्था राबवत.

पुरातत्वशास्त्रज्ञांना चर्मपत्रे तसेच कबरींच्या भिंतिंवर तेथील लोकांच्या जीवनाची तसेच इमारतींची वर्णने व चित्रे मिळाली. त्यामुळेच आज आपल्याला इजिप्तच्या प्राचीन संस्कृतीबद्दल बरीच माहिती आहे.

इजिप्तचे लोक लिखाण करताना विचित्र चित्रलिपी वापरत. सर्व लिखाण चित्ररुपात असल्यामुळे बराच काळ पुरातत्वशास्त्रज्ञ ते समजू शकले नाहीत. एके दिवशी एका फ्रेंच विद्वानाला एक दगड मिळाला. त्यावर एकच शिलालेख ग्रीक भाषेत तसेच चित्रलिपीत लिहिला होता. त्याला ग्रीक भाषा येत असल्यामुळे तो चित्रलिपीचाही अर्थ लावू शकला. रोसेटा या ठिकाणी मिळाल्यामुळे या दगडाला “रोसेटा स्टोन” म्हणतात. इथूनच आपल्याला प्राचीन इजिप्तची चित्रलिपी वाचणे शक्य होऊ लागले.



त्याकाळात लिखाणाची कामे धर्मोपदेशकांकडून केली जात. कागदाचा शोध लागला नसल्यामुळे ते लिखाणासाठी *पपायरस* नावाच्या वनस्पतीच्या खोडाचा वापर करत. *पपायरस* या शब्दापासूनच आपल्याला *पेपर* हा शब्द मिळाला आहे.

ते *पपायरस* खोडाच्या आतील भागाच्या लांब लांब पातळ पट्ट्या काढत. या पट्ट्यांना शेजारीशेजारी ठेवत आणि त्यांच्यावर इतर पट्ट्या ठेवत. यामुळे पट्ट्यांची चटई बनत असे. ही चटई ते पाण्यात ठेवत. यामुळे एकमेकांवर ठेवलेल्या पट्ट्या एकसंध होत. मग ते या चटईला सपाट दगडावर ठेवून हातोड्याने ठोकत. शेवटी चटईला सूर्यप्रकाशात सुकवून, हस्तीदंताच्या तुकड्याने घासून गुळगुळीत करत. मग हा लवचिक कागद लिखाणासाठी तयार होत असे.

*पपायरस*च्या अशा चटयांना जोडून लांबचलांब गुंडाळी बनवली जात असे. त्याची आजकालच्या पुस्तकांसारखी बांधणी केलेली नसे. गुंडाळीला दोन लाकडी रुळांवर गुंडाळले जात असे. वाचताना गुंडाळी एका रुळावरून दुसऱ्या रुळावर सरकवत न्यावी लागत असे. पुस्तकाचे पान पलटवण्याच्या तुलनेत हे काम बऱ्यापैकी कठीण असावे.

लिखाणासाठी पुजारी लोक गवत किंवा पेंढ्यापासून बनलेली रंगीत शाई व पेन वापरत. काही *पपायरस* गुंडाळ्यांवर त्यांनी अतिशय सुंदर चित्रे चितारल्याचे दिसून येते.



इजिप्शियन लोक बांधकाम करण्यात निपुण होते. ब्रिटनमध्ये स्टोनहेंजची निर्मिती होण्याच्या फार पूर्वीच त्यांनी आपल्या देवतांची भव्य मंदिरे उभारली होती. यांपैकी बरीचशी मंदिरे इजिप्तमध्ये कर्नाक याठिकाणी आजदेखील बघायला मिळतात. याच ठिकाणी इजिप्शियन लोकांनी हजारो वर्षांपूर्वी महान “हॉल ऑफ कॉलम्स” उभारला.

त्यांनी त्यांच्या राजांची शिल्पेदेखील कोरली. या राजांना ते फेरो म्हणत. थेबेस शहरानजिक अमेनहोटप नावाच्या फेरोची अशीच दोन महान शिल्पे आहेत. प्राचीन काळी सूर्य उगवल्यावर त्यांपैकी एका शिल्पातून संगीताचे सूर ऐकू येत असत. ते शिल्प आपल्या मुखातून सूर आळवून सूर्याला प्रणाम करत आहेत, असेच लोकांना तेव्हा वाटत असे.

संपूर्ण इजिप्तमध्ये मंदिरांच्या भिंतिंवर देवतांची शिल्पे आणि चित्रे पाहायला मिळतात. यांतील काही देवता अगदी विचित्र वाटतात. एका देवतेचे शरीर मनुष्याचे आणि मस्तक बहिरी ससाण्याचे आहे. या देवतेला पूर्वी “रा” म्हणत पण आता त्याला “अमन-रा” म्हणून पूजतात.

“रा” ही सूर्यदेवता आहे आणि सर्वात महत्त्वाची एक देवता मानली जाते. ही देवता आकाशात नावेतून दररोज पूर्वेकडून पश्चिमेला सफर करते आणि नाईलच्या लोकांना प्रकाश आणि जीवन बहाल करते, असे येथील चित्रांमध्ये दाखवले आहे.



प्राचीन इजिप्तच्या स्मारकांपैकी कैरोजवळ असलेल्या गीझा शहरामधील ग्रेट पिरॅमिड व स्फिंक्स ही सर्वाधिक प्रसिद्ध आहेत.

ग्रेट पिरॅमिड हे स्मारक अत्यंत जड मोठ्या दगडांपासून बनलेले आहे. हे स्मारक तेरा एकर जमिनीवर पसरलेले आहे. ते लंडन येथील सेंट पॉल कॅथेड्रलपेक्षा दीडशे फूट जास्त उंच आहे. त्याचा पाया चौरसाकृती आहे आणि त्याच्या सर्व बाजू फारतर एखादा इंच फरक पडेल इतक्या समान आहेत. त्याच्या भिंती आतल्या बाजूस तिरक्या असून वर मनोऱ्याला जाऊन मिळतात.

हे पिरॅमिड चेओप्स नावाच्या एका फेरोने बनवले होते. त्याने पाच हजार वर्षांपूर्वी इजिप्तवर राज्य केले. पिरॅमिडच्या आत दूरवर दफन कक्ष आहे. तिथे लांबलचक, अरुंद मार्गिकेवरून पोहोचता येते. या महान स्मारकाच्या निर्मितीसाठी तसेच दगड वाहून नेण्यासाठी हजारो गुलामांना तब्बल वीस वर्षे कामाला लावले होते.

मानवाचे शीर व सिंहाचे धड असलेले स्फिंक्स हे स्मारकदेखील तेवढेच प्रसिद्ध आहे. एकाच मोठ्या दगडातून कोरलेले हे स्फिंक्स ग्रेट पिरॅमिडच्या जवळच उभे आहे. ते 189 फूट लांब आहे. स्फिंक्स बहुधा ग्रेट पिरॅमिड बनण्याच्या अगोदरच त्याठिकाणी होते. पण काही तज्ज्ञांच्या मते दोन्ही स्मारके एकाच काळात बनली. स्फिंक्स एवढे भव्य आहे की त्याच्या दोन पंजांच्या दरम्यान कधीकाळी एक मंदिर होते.



पिरॅमिडची उभारणी फार काळजीपूर्वकरित्या करण्यात आली होती. प्रमुख गवंडी पिरॅमिडच्या दगडांचे तसे तिरप्या भिंतिंचे मापन मोठ्या अचूकपणे करत, असे आढळते. सोबतच्या चित्रात एक गवंडी दोरी वापरून दगडाचे माप घेताना दिसत आहे.

फेरो कुफू याच्या पिरॅमिडसाठी नाईल नदीच्या पलिकडच्या तीरावरून दगड आणण्यात आले. त्यांना आणण्यासाठी बरेच परिश्रम करावे लागले. दगड वाहून नेण्यासाठी त्यांच्या खाली रोलर टाकावा लागे व त्यासाठी दगड थोडासा उचलावा लागे. दगड उचलण्यासाठी गुलाम मजूर चिवट लाकडाची लांबलचक तरफ वापरत असावेत. रोलर टाकल्यावर शेकडो मजूर चामड्यापासून बनलेल्या दोरखंडाने हा दगड खेचून नेत असत.

झुटहॉटप नावाच्या स्थानिक गव्हर्नरच्या कबरीमध्ये एक भव्य शिल्प वाहून नेणाऱ्या मजुरांचे चित्र आहे. या शिल्पावर एक माणूस उभा आहे. तो हाताने टाळी वाजवून गुलामांना एकाचवेळी ताकद लावण्याचा इशारा देत आहे.

दगडांना आकार देण्यासाठी तांब्याची छिन्नी वापरत असत. काही काळाने यासाठी कास्य आणि लोखंडी छिन्नीचा वापर होऊ लागला. इजिप्शियन लोकांकडे आजच्यासारखी क्रेन व इंजिने अशी यंत्रे नव्हती. ही आधुनिक यंत्रे वापरून त्यांनी भव्य पिरॅमिड बांधले असते, तरीही ते एक विशाल कार्य ठरले असते.



प्राचीन इजिप्तमधील वेगवेगळे राजे हे भिन्नभिन्न राजघराण्यांचे वंशज होते. एका राजघराण्यातील राजे हे सहसा एकाच कुटुंबातून आलेले असत. काही वेळेला फेरोला अपत्य नसे तर काही वेळेला दुसऱ्या वंशाचा राजा इजिप्तचे राज्य जिंकत असे. यातून एक नवा राजवंश सुरू होत असे.

अठरावे आणि एकोणीसावे राजघराणे ही सर्वात मोठी राजघराणी होती. यांतील फेरोंनी ईसवीसन पूर्व 1650 ते 1280 या काळात राज्य केले. सुमारे चारशे वर्षांच्या या काळाला “नव साम्राज्य” म्हणतात. इंग्लंडमध्ये राणी एलिझाबेथ प्रथम यांची राजवट ते सध्याची राजवट एवढाच मोठा हा काळ आहे. अठराव्या राजघराण्यातील पहिला फेरो याच्या राजवटीत इजिप्तचा एक नवा अध्याय सुरू झाला. सुमारे साडेचारशे वर्षे इजिप्तवर कब्जा केलेल्या परप्रांतीय राजघराण्यांना त्याने इजिप्तबाहेर हुसकावून लावले.

थोथमस तिसरा हा सर्वात कर्तबगार फेरो होता. त्याने इजिप्तच्या लगत असलेला, पश्चिमेकडील लिबियाचे वाळवंट ते पूर्वेकडील तायग्रिस नदी, एवढा मोठा भूप्रदेश जिंकून घेतला. शत्रुवर विजय मिळवलेला, रथावर आरूढ झालेला हा फेरो इजिप्तमधील अनेक भित्तीचित्रांमध्ये दिसतो. थोथमस तिसरा याने एक दगडी स्तंभ बनवून घेतला होता. पण त्याला “क्लिओपात्राची सुई” अशी चुकीची ओळख मिळाली. लंडनमधील एका नदीच्या बांधावर आज हा दगडी स्तंभ पाहायला मिळतो.



या दोन राजघराण्यांतील फेरो हे महान सैनिक व विजेते होते. सोबतच्या चित्रात यांपैकी एक फेरो युद्धात विजय मिळवून इजिप्तला परतल्याचे दाखवले आहे.

या फेरोंच्या कबरींतील भित्तीचित्रांमध्ये असे अनेक विजय साजरे होताना दाखवले आहेत. यात विजेत्याच्या रथामागे शेकडो युद्धकैदी चालताना दिसतात. या कैद्यांना एक तर ठार मारत किंवा त्यांना गुलाम म्हणून विकत. अनेकांना फेरोच्या कबरी तसेच मंदिरे यांच्या उभारणीसाठी आयुष्यभर राबवण्यात येई.

एकोणीसाव्या राजघराण्यात दोन महान फेरो होऊन गेले. एक होता सेती पहिला. यानेच कर्नाकमध्ये *हॉल ऑफ कॉलम्स* उभारला आणि थेबेसजवळ *व्हॅली ऑफ टॉम्ब्स* येथील खडकांमध्ये मोठमोठ्या कबरी बनवल्या.

दुसरा महान फेरो होता, रॅमेसिस दुसरा. त्याने सदुसष्ठ वर्षे राज्य केले व अनेक उत्कृष्ट बांधकामे केली. त्याच्याच काळात नाईल नदी ते लाल समुद्रापर्यंत कालवा तयार झाला. त्याने देवाचा पुत्र मानल्या जाणाऱ्या जोसेफचे सन्मानाने स्वागत केले. याच फेरोच्या मुलाच्या, मेनेथाच्या, शासनकाळात ज्यू लोकांना इजिप्तमधून बाहेर काढण्यात आले. बायबलमधील *उत्पत्ती आणि स्थलांतर* या अध्यायांमध्ये याबद्दल वाचायला मिळते.



रॅमेसिस दुसरा याच्या काळात इजिप्त एक महान व शक्तिशाली राष्ट्र होते. तिथे आफ्रिका व भूमध्यसागरी प्रदेशांतून माल येत असे. कबरीतील चित्रांमध्ये हत्ती, जिराफ, बिबट्या, माकड यांच्यासोबतच कित्येक विचित्र प्राणी दिसतात. महान फेरोला खंडणी म्हणून हे प्राणी दिले जात.

पूर्वेकडून रस्तेमार्गाने भारतातील उंची अलंकार, पर्शियातील मसाल्याचे पदार्थ, धूप व चीनमधील रेशीम इजिप्तमध्ये आणले जात असे. इजिप्तचा खजिना नेहमी सोन्या-चांदीने भरलेला असे. फेरोच्या कबरीतील उंची वस्तुंवरून असे दिसते की रत्नजडित अलंकार व सुशोभित फर्निचर बनवण्यात प्राचीन इजिप्तचे कारागिर अत्यंत कुशल होते. .

विजय मिळवलेल्या देशातून इजिप्तला खंडणी येई तेव्हा रस्त्यावर मिरवणूक काढून ती लोकांना दाखवली जाई. याद्वारे आपला फेरो किती महान व प्रभावशाली आहे, हे लोकांना दाखवले जात असे.

इजिप्तमधील गरीब शेतकऱ्यांना गुलाम म्हणून वागवले जात असे. जमिनीसोबतच त्यांचीही खरेदी-विक्री होत असे. इजिप्तमध्ये त्याकाळात पैसा हे चलन वापरात नव्हते. साहजिकच, या गुलामांकडेही काही पैसा-अडका नसे. त्यांना फक्त जिवंत राहाण्यापुरते काहीतरी मिळत असे.



फेरो आणि त्याची राणी उंची पोषाख व किंमती अलंकार घालत असत. त्याचवेळी गरीब शेतकऱ्याला मात्र फाटके कपडे घालावे लागत. भित्तीचित्रांमध्ये हे सगळं पाहायला मिळते. इजिप्तने रुक्ष हवामानातही या प्राचीन वस्तुंचे जतन केलेले आहे. आजही आपण या प्राचीन कपड्यांना व अलंकारांना बघू आणि स्पर्श करू शकतो.

इजिप्तमधील तापमान खूप जास्त असते. त्यामुळे तेथील लोक अंगावर कमीच कपडे घालत. फेरोसुद्धा अंगावर फक्त एक लहानसा कपडाच ठेवत असे. कपड्यांची कमी ते अंगांवर उंची दागिने, कंठहार आणि हातात कडी घालून भरून काढत.

एखाद्या समारंभप्रसंगी फेरो डोक्यावर दुहेरी मुकुट चढवत. अगदी सुरुवातीच्या काळात, उत्तर इजिप्त व दक्षिण इजिप्त असे दोन देश होते. या देशांच्या राजांचे मुकुटही वेगवेगळे होते. नंतरच्या काळात हे दोन देश एक झाले. मग एक झालेल्या इजिप्तचा राजा दोन्ही देशांचे मिळून दुहेरी मुकुट डोक्यावर ठेवू लागले.

उत्तर इजिप्तचा मुकुट लांब व पांढरा होता. त्याच्या टोकावर एक गोलाकार मूठ होती. दक्षिण इजिप्तचा मुकुट लाल व विशिष्ट आकाराचा होता. सोबतच्या चित्रात तुम्ही फेरोच्या डोक्यावरील हा दुहेरी मुकुट पाहू शकता.



इजिप्त एक समृद्ध देश होता आणि तिथे अनेक श्रीमंत लोक राहात होते. दरबारातील स्त्रिया व श्रीमंत पुरुषांच्या बायका काहीही कामधंदा करत नसत. त्या आपला बराचसा वेळ खूप नट्टापट्टा करण्यात घालवत.

प्राचीन इजिप्तच्या दीर्घ इतिहासात चालीरितींमध्ये बरेच बदल झाले. परंतु येथील स्त्रिया चेहऱ्याची भरपूर सजावट करत असत हे त्यांच्या ड्रेसिंग टेबलमध्ये जतन करून ठेवलेल्या अलंकारांवरून कळते. लंडनच्या ब्रिटीश संग्रहालयात त्याकाळातील गालांना रंगवण्याची पावडर, भुवया कोरण्याची पेन्सिल, पावडरचे डब्बे, अत्तराच्या कुप्या, आकर्षकरित्या सुशोभित केलेले आरसे व कंगवे आपण बघू शकतो.

आधुनिक काळातील स्त्रिया आपल्या केसांना सजवण्यासाठी बराच वेळ देतात. प्राचीन इजिप्तच्या स्त्रियासुद्धा हेच करत असत. त्या आपल्या केसांची निगा राखण्याऐवजी त्यांना कापून लहान करत आणि नकली केसांचा टोप घालत. या टोपचा आकार वेळोवेळी बदलत असे.

सोबतच्या चित्रात एक इजिप्शियन स्त्री आपल्या डोळ्यांचा शृंगार करत असताना दिसते. तिच्या दासी तिला याकामी मदत करत आहेत. ती कदाचित आपल्या डोळ्यांखाली एक हिरवी रेखा काढत आहे. ती तिच्या पापण्या व भुवया काळ्या करत आहे. यामुळे तिचे डोळे अधिक सुंदर व मोठे दिसत आहेत. तिच्या शेजारी टेबलवर एक बरणी आहे. त्यात धूप व गंधरसापासून बनलेले सुवासिक तेल आहे.



तीन हजार वर्षांपूर्वी रॅमेसिस दुसरा याच्या काळातील शाही मेजवानी हा एक अत्यंत आकर्षक सोहळा असावा. इजिप्शियन लोक सुसंस्कृत व सद्वर्तनी होते हे भित्तीचित्रांवरून दिसून येते.

सुरुवातीच्या काळात इजिप्शियन लोक भोजनसाठी जमिनीवर बसत. एकोणीसाव्या राजघराण्याच्या राजवटीत, इसवीसन पूर्व 1650 ते 1400 या काळात ते मऊशार तक्क्यांच्या खुर्च्यांमध्ये बसू लागले. एक लहानसे टेबल कमळाच्या फुलांनी सजवलेले असे. मद्याच्या बरण्याही फुलांनी सजवलेल्या असत. तेव्हा पाहुणे आपल्या केसांत फुले माळत असत.

शाही मेजवानीमध्ये दहा प्रकारचे मांस, पाच वेगवेगळे पक्षी, सोळा प्रकारचे पाव व केक असे पदार्थ असत. फळे व मद्यही भरभरून असे. सर्व काही चांदीच्या ताटात वाढले जाई. पाव वेगवगळ्या मोहक आकारात कापलेले असत.

भोजनादरम्यान संगीतकार पाहुण्यांचे मनोरंजन करत. ते बासरी, तुतारी, हार्प वगैरे वाद्ये वाजवत. यांपैकी अनेक वाद्ये आजसुद्धा संग्रहालयात पाहायला मिळतात. हजारो वर्षांपूर्वी इजिप्शियन लोकांनी जे वाद्यसंगीत ऐकले तेच वाद्यसंगीत आजसुद्धा आपण वाजवून पाहू शकतो. संगीतकार व कधीकधी पाहुण्यांच्या डोक्यावर सुवासिक मेणाचे शंकू असत. हे शंकू वितळून केसांवर पडत असत.



अनेक कबरींमध्ये त्या काळातील माती व लाकडापासून बनलेल्या घरांच्या प्रतिकृती मिळाल्या आहेत. इजिप्शियन लोक कशा प्रकारच्या घरांमध्ये राहात, हे त्यामुळे आपल्याला कळू शकले.

ही घरे बऱ्याचदा दोन मजली असत. त्यामध्ये सज्जा असे. सज्जाला उजळ रंगात रंगवलेले कापडी छप्पर असे. खिडक्यांना काचा नसत. उत्तर इजिप्तच्या तप्त हवामानात या मोकळ्या खिडक्यांमधून थंड हवेच्या सुखद झुळका घरात येत असत. घराचे छप्पर आजच्या कैरोतील घरांसारखे सपाट असे.

श्रीमंत लोकांच्या घरांमध्ये सुंदररित्या कोरलेल्या व सजवलेल्या खुर्च्या व टेबल असत. भिंतींवर रंगीत चटया लटकत असत व फरशीवर मुलायम रजई आच्छादलेली असे. घराच्या आतील तसेच बाहेरील भाग उजळ रंगात रंगवलेला असे. बऱ्याच घरांसभोवती नारळ, अंजीर, द्राक्ष यांची झाडे व सर्व प्रकारच्या फुलांची झुडुपे असलेले बगीचे असत.

गरीब लोकांची घरे मात्र खूप वेगळी असत. ती उन्हात सुकवलेल्या मातीच्या विटांनी बनलेली असत. घराला कोणताही रंग नसे. घरात केवळ एकच खोली असे व त्यात फर्निचर नसे. अशी घरे आजही इजिप्तमधील गावांमध्ये पाहायला मिळू शकतात. फेरोंच्या राजवटीतील घरांच्या तुलनेत आजच्या घरांमध्ये फारसा बदल झालेला नाही.



आतापर्यंत आपण पाहिले की इजिप्शियन लोकांनी पिरॅमिड, कबरी व मंदिरे उभारली. या प्रचंड इमारती उभारण्यासाठी हजारो मजुरांचा हातभार लागला. पण या मजुरांव्यतिरिक्त सुतार, विटा बनवणारे, रंगारी, गवंडी, माळी व घर सजवणारे अशा असंख्य कारागिरांनी सामान्य लोकांसाठी घरे बनवली.

भित्तीचित्रे व चर्मपत्रे यांमध्ये असे अनेक कारागीर काम करताना आपल्याला दिसतात. विटा बनवणारे कारागीर लाकडी साच्यांमध्ये विटांना आकार देताना व त्यांना उन्हात सुकवताना आपल्याला दिसतात. या विटांपासून ते घराच्या भिंती उभारत. या भिंती कधीकधी ऐंशी फूट जाड असत.

त्याकाळीही सुतारांकडे आज वापरतात तशी छिन्नी व करवतीसारखी अवजारे असत. आजच्या काळातील सुतार लाकडाचे सांधे बनवतात. पण तेव्हाचे सुतार काटकोन असलेले लाकडाचे तुकडे बनवण्यासाठी अनेक वर्षे झाडांचे संगोपन करत. त्यांनी झाडाच्या तीन फांद्या योग्य दिशेत वाकवून तीन पायांचे स्टुलसुद्धा बनवलेले दिसते. या स्टुलची सीट ते झाडाच्या बुंध्यापासून बनवत.

कुंभारकाम व काचकाम करणारे तसेच सोन्या-चांदीचे काम करणारे लोक हे कुशल कारागीर असत. जगभरच्या संग्रहालयांमध्ये या कारागिरांनी बनवलेल्या वस्तुंचे नमुने पाहायला मिळतात. हे कारागीर अनेकदा लाल खडा, नीलम यांसारखे रंगीत दगड सजावटीसाठी वापरत.



इजिप्शियन लोक हे प्रामुख्याने शेतकरी होते. पण ते नाईल नदीच्या पाण्यावर अवलंबून असलेली विशिष्ट पद्धतीची शेती करत. आजही अशा पद्धतीची शेती तिथे केली जाते.

इजिप्तचा प्रदेश हा नाईल नदीच्या काठी असलेला एक लांब, अरुंद पट्टा आहे. त्याच्या पश्चिम व पूर्व बाजुंना ओसाड वाळवंट आहे. नाईल नदी नसती तर आज इजिप्तचे अस्तित्वच नसते. दर उन्हाळ्यात मध्य आफ्रिकेत मुसळधार पाऊस पडला की भरून वाहाणारी नाईल नदी इजिप्तमधील तप्त कोरड्या भूमीला भिजवून तृप्त करते.

एखाद्या वर्षी पाऊस पडला नाही की इजिप्तमध्ये दुष्काळ पडतो. पण आज या नदीवर एक प्रचंड मोठे धरण बांधलेले आहे. या धरणात मुसळधार पावसाचे पाणी जमा होते व त्यामुळे दुष्काळाची शक्यता कमी होते.

प्राचीन इजिप्शियन शेतकऱ्याच्या हातात फार काही नसे. पीक काढण्यासाठी त्याला नाईलच्या पाण्यावरच अवलंबून राहावे लागत असे. पाण्याने जमीन भिजली की तो जमीन नांगरून त्यात बियाणे विखुरत असे. कधी कधी तर तो जमीन नांगरल्याविनाच बियाणे टाकत असे. मग ही जमीन तुडवण्यासाठी तो डुकरांची झुंड सोडत असे. यानंतर त्याला कापणीच्या हंगामातच काम करावे लागत असे. साहजिकच, प्राचीन इजिप्शियन लोक नाईल नदीला देवतेसमान पूजत असत.



नाईल नदीने केवळ इजिप्तच्या जमिनीलाच सुपीक केले नाही तर तिने इतरही गोष्टींमध्ये मदत केली. इजिप्तच्या एका भागातून दुसऱ्या भागात जाण्यासाठी नाईल नदी खूप सोयीस्कर पडत असे. नाईल नदीतील मासे हे अनेकांच्या रोजच्या अन्नाचा भाग होता.

मासेमारीसाठी इजिप्शियन लोक नावा वापरत. फार पूर्वीपासूनच ते झाडाच्या बुंध्याला पोकळ करून त्यापासून नावा बनवत असत. रॅमेसिसच्या राजवटीतच ते मोठमोठी त्रिकोणी शिडे व वल्हे असलेल्या बोटी बांधायला शिकले होते. फेरोंच्या कबरींमध्ये अशा बोटींच्या सुंदर प्रतिकृती पाहायला मिळतात. यात नाविक तसेच बोटीच्या मागच्या भागात सुकाणू चालवणारी व्यक्ती पाहायला मिळते.

अशाच प्रकारच्या बोटी आजही नाईल नदीच्या किनारी पाहायला मिळतात. त्यात शिडांचा उपयोग करून प्रवाहासोबत सहजपणे प्रवास करता येई. पण प्रवाहाविरुद्ध प्रवास करताना नाविकांना जास्त जोर लावावा लागत असे.

इजिप्शियन लोक या बोटीतून किंवा किनाऱ्यावरून मासे पकडत. रॅमेसिस राजवटीतील मासेमारी करण्याची पद्धत आजदेखील वापरली जाते. या पद्धतीत नावेतून एक अर्धवर्तुळाकार जाळे नदीत टाकले जाते. या जाळ्याची टोके किनाऱ्यावर असत. दोन्ही टोके हातात धरून जाळे नदीबाहेर ओढून आणले की त्यात अडकलेले मासेही किनाऱ्यावर येत.



एकोणीसाव्या राजघराण्याच्या राजवटीत इजिप्त विकासाच्या उच्च टप्प्यावर पोहोचला. तोवर इजिप्तला गरजेच्या अनेक वस्तू इतर देशांकडून आयात कराव्या लागत.

सात-आठ हजार वर्षांपूर्वी, सुरुवातीच्या राजघराण्यांच्या राजवटीत इजिप्तचा व्यापार नुबियाच्या वाळवंटामार्गे होत असे. बहुसंख्य इजिप्शियन लोक उत्तर भागात राहात असत. समुद्र आणि त्याच्या पलिकडील प्रदेशांबद्दल लोकांना फारच कमी माहिती असे.

रॅमेसिसच्या राजवटीत उत्तर व दक्षिण इजिप्त एक झाले आणि लोक नाईल नदीच्या खोऱ्यात वसू लागले. हा भाग भूमध्यसागराच्या किनाऱ्यावर असल्यामुळे लोकांना आता फिनिशियन जहाजे व क्रिटचे नाविक परिचित झाले. त्यामुळे लोकांनी स्वत:ची जहाजे बनवण्याचे ठरवले.

अशा अनेक जहाजांच्या प्रतिकृती आज इजिप्तच्या फेरोंच्या कबरींमध्ये पाहायला मिळतात. उजळ रंगात रंगवलेल्या या जहाजांचा कमळाच्या आकारासारखा पुढचा भाग सुशोभित केलेला असे. या जहाजांना एकच शीड असे. वाळवंटात वाऱ्याच्या हलक्याशा झुळुकीलाही ते प्रतिसाद देत असे. वारा अजिबात नसताना युद्धकैदी गुलाम वल्ही मारून जहाजाला हाकत असत. आपले काम चोख बजावण्यासाठी, नाईल नदीतून येण्या-जाण्यासाठी जहाजाची बांधणी मजबूत केलेली असे.



फेरो किंवा दरबारातील महत्त्वाचा अधिकारी मृत्यू पावल्यावर अनेक प्रकारचे विधी पार पाडले जात. अशा विधींमुळे तसेच कबरीमध्ये काढलेल्या दैनंदिन व्यवहारांच्या चित्रांमुळे आज आपल्याला त्याकाळातील लोकांबद्दल बरीच माहिती आहे.

फेरोचे मृत शरीर कित्येक गज लांब असलेल्या तागाच्या कपड्यामध्ये गुंडाळत. ते मग लाकडी पेटीत ठेवत. अशा काही पेट्या ब्रिटीश संग्रहालयात पाहायला मिळतात. या पेट्या उजळ रंगात रंगवलेल्या असत व त्यांचा समोरचा भाग काळजीपूर्वक कोरलेला असे. या पेट्यांवर सोन्याच्या पातळ पत्र्यांचे आच्छादन असे.

अशी पेटी मग एका दुसऱ्या अशाच पेटीत ठेवत. पुन्हा ही दुसरी पेटी तिसऱ्या तशाच पेटीत ठेवत. या साऱ्या विधींदरम्यान धर्मोपदेशक पवित्र ग्रंथाचे पठण करत. फेरोचे शरीर कबरीमध्ये ठेवण्याचा हा विधी तब्बल सात दिवस चाले.

शेवटी सर्वात बाहेरची पेटी गुलाम लोक एका गाडीवरून खेचून नेत. बऱ्याचदा या पेटीला विशेष नावेमध्ये ठेवून नाईल नदीपार घेऊन जात. अंतिमत: पेटी खडकातून कोरून काढलेल्या पिरॅमिडमध्ये किंवा कबरीमध्ये ठेवत व त्याचा प्रवेशमार्ग बंद करत.



इजिप्तमध्ये एक खडकाळ पर्वतमय भाग आहे. तिथे हिरवाईचे नामोनिशाण नाही. तीव्र उतार असलेले कडे व भव्य मोठे गुळगुळीत खडक वालुकामय जमिनीवर उभे आहेत. या भागाला *व्हॅली ऑफ टॉम्ब* (कबरींचे डोंगर) म्हणतात.

डोंगरामध्ये सर्वत्र फेरो व उच्च अधिकाऱ्यांच्या कबरी खोदलेल्या आहेत. तेलाच्या दिव्यांच्या मंद प्रकाशात काम करून कारागिरांनी खडकांतून या कबरी खोदल्या आहेत. तरीही कबरीच्या भिंतींवरील कोरीवकाम व रंगकाम अत्यंत कुशलतेने केलेले दिसते.

कबरींमध्ये नेहमी मौल्यवान भेटवस्तू ठेवलेल्या असत. काम करणारे कारागिर अनेकदा त्यांची चोरी करत. यासाठी या डोंगराकडे येणाऱ्या अरुंद मार्गावर सैनिकांना तैनात करत. चोरांचे प्रयत्न निष्फळ करण्यासाठी फेरोंचे शव अनेकदा एका कबरीतून दुसऱ्या कबरीत फिरवले जात असे.

आतील वस्तुंची चोरी झाली नाही अशी एकही कबर नाही. पण 1922 साली अशी एक कबर मिळाली. याच्या आतील मौल्यवान खजिन्याला गेल्या तीन हजार वर्षांत कुणी हात लावला नव्हता. तरूण फेरो तुतेनखामेनची ही कबर होती. त्याच्या कबरीची अद्भुत माहिती देणारे एक पुस्तक प्रकाशित झाले आहे. त्यात कबरीतील मौल्यवान वस्तुंची छायाचित्रेही आहेत.



तुतेनखामेनची कबर अनपेक्षितपणे सापडली. ही कबर दुसऱ्या एका फेरोच्या कबरीखाली होती. चोरांनी वरची कबर फोडून लुटली तेव्हा त्याच्या ढिगाऱ्याखाली खालची कबर पूर्णपणे झाकली गेली.

नोव्हेंबर 1922 मध्ये तुतेनखामेनची कबर शोधली गेली. तीन हजार वर्षांपेक्षा जास्त काळ त्यात कोणी शिरले नव्हते. त्यामुळे त्यातील फेरोसोबत दफन केलेला सर्व खजिना तसाच्यातसा कायम होता.

मृत्यूनंतर माणूस दुसऱ्या जगात जातो व तिथे इथल्यासारखंच जीवन जगतो, अशी इजिप्शियन लोकांची श्रद्धा होती. त्यामुळे ते कबरीमध्ये मृत शरीरासोबत त्याच्या गरजेच्या वस्तू ठेवत. फेरोंची कबर साहजिकच खूप सुशोभित करत. त्यात ठेवलेले फर्निचर सोन्याने व मौल्यवान खड्यांनी जडवत. कबरीत सोन्याने बनलेले वाडगे, कप यांसारख्या वस्तू ठेवत. या वस्तुंवर सुंदर नक्षीकाम केलेले असे.

तुतेनखामेनच्या कबरीतील खजिना कैरौमधील संग्रहालयात पाहायला मिळतो. तीन हजार वर्षांपूर्वी इजिप्तमधील लोक कसे जीवन जगत होते, याची कल्पना त्यावरून येते. सोबतच्या चित्रात या खजिन्यातील काही वस्तू पाहायला मिळतात. त्या काळात ब्रिटनमधील लोकांचे जीवन कसे असेल, असे कुतूहल या वस्तू पाहाताना मनात निर्माण होते.



कबरीतील सगळी भित्तीचित्रे, सुशोभित चर्मपत्रे व फर्निचर पाहून प्राचीन इजिप्शियन लोक कुशल कलाकार होते, असे म्हणता येते.

त्यांची कलाकृती विशिष्ट प्रकारची होती. आज आपल्याला ती विचित्र वाटू शकते. त्यांच्या कलेमध्ये बरीच सजावट आहे, असे त्यांची चित्रे पाहिल्यावर वाटते. उदाहरणार्थ, या चित्रांमध्ये गुलाम व सैनिक यांच्या रांगा अगदी एकसारख्या, एकामागोमाग एक अशा काढलेल्या आहेत. या चित्रांत चेहऱ्यांची एकच बाजू दिसते पण धड मात्र समोरून दिसते तसे काढलेले आहे. डोळे नेहमी आकर्षकपणे रंगवलेले दिसतात. पायसुद्धा एका बाजूने पाहावेत तसे दिसतात. पावलांच्या बोटांचे चित्र काढायला कठीण वाटत असल्यामुळे ते टाळण्यासाठी कलाकार असे करत असावेत.

तरीही जेव्हा इजिप्शियन लोक शिल्पे घडवत किंवा शवपेटीवर कोरीवकाम करत तेव्हा त्या कलाकृती अगदी जिवंत झाल्यासारख्या वाटत.

इजिप्शियन लोकांनी राणी नेफर्टिटीच्या डोक्याचे एक अत्यंत सुंदर शिल्प जतन केले आहे. ते दगडातून घडवलेले आहे आणि खूप जिवंत वाटते. त्यात कोरलेले डोळे खूप नैसर्गिक वाटतात. हे शिल्प पाहून वाटते की इजिप्शियन कलाकारांनी मनात आणले असते तर ते नैसर्गिक भासणारी चित्रे काढू शकले असते.



कुफूच्या महान पिरॅमिडला पाहून वाटते की इजिप्शियन लोक बांधकाम करताना अचूक मापे घेत असत. याचे कारण त्यांना अंकगणित व भूमिती यांचे ज्ञान होते. फक्त त्यांच्या मापन पद्धती प्राचीन होत्या. ब्रिटीश संग्रहालयात एक मनोरंजक चर्मपत्र आहे. त्यावर अंकगणितातील अनेक समस्या दिसतात. त्यांतील अनेक समस्या व्यावहारिक आहेत, जसे, शेताचे क्षेत्रफळ कसे काढायचे, मधमाशीच्या पोळ्याच्या आकाराच्या गोदामात किती धान्य साठवता येईल.

इजिप्शियन लोकांनी आभाळातील ताऱ्यांचा अभ्यासही केला होता. हजारो वर्षांपूर्वी त्यांनी एक कॅलेंडर तयार केले. आजही आपण त्याचा उपयोग करतो. काही बाबतीत हे कॅलेंडर आधुनिक कॅलेंडरच्या तुलनेत उजवे होते कारण त्यांच्या कॅलेंडरमध्ये प्रत्येक महिन्यात समान दिवस येतात.

इजिप्शियन लोक आजारी पडत तेव्हा डॉक्टरला बोलवत असत. जडीबुटींसोबतच देवतेची प्रार्थना हेच त्याकाळी औषध मानले जाई. त्यांच्याकडे आजच्यासारखी औषधे नव्हती. पण ते कुशल शल्यविशारद होते.

प्राचीन इजिप्तमधील जीवन दु:खी नव्हते. लोकांना खेळायला आवडे. विविध प्रकारचे खेळ जसे, बुद्धिबळ आणि बॉलचे विविध प्रकारचे खेळ ते खेळत. मुले पऱ्यांच्या कहाण्या ऐकत. यांतील *सिंड्रेला* आणि *अलिबाबा व चाळीस चोर* आजही प्रचलित आहेत.



प्राचीन इजिप्तबद्दल बोलताना क्लिओपात्राचा उल्लेख हमखास करावा लागतो. क्लिओपात्राबद्दल शेक्सपियरसारख्या असंख्य लेखकांनी कथा आणि नाटके लिहिली आहेत.

खरंतर क्लिओपात्राचा प्राचीन इजिप्तशी कसलाही संबंध नव्हता. रॅमेसिसच्या तब्बल तेराशे वर्षांनंतर इस.पूर्व 68 मध्ये क्लिओपात्राचा जन्म झाला.

अलेक्झांडर द ग्रेट हा मॅसिडोनिया देशातून आला होता. इसवीसन पूर्व 332 मध्ये त्याने इजिप्तवर विजय मिळवला. आपला एका सेनापती टॉलेमी याला त्याने तिथे राजा म्हणून नियुक्त केले. यामुळे इथे नव्या राजघराण्याची सुरुवात झाली. इजिप्तवर राज्य करणारी क्लिओपात्रा ही अलेक्झांडर द ग्रेट याच्या वंशजांपैकीच एक होती.

ती फक्त सतरा वर्षांची असताना आपल्या भावासोबत संयुक्त रुपात इजिप्तची राणी बनली. पण इतक्या तरूण मुलीला एखाद्या देशाचे राज्य सांभाळणे कठीण होते. लवकरच, क्लिओपात्राला देशाबाहेर काढले गेले. मग ती आपले सैन्य उभारण्यासाठी सीरिया देशात गेली. इजिप्तचे सिंहासन प्राप्त करण्याची तिची इच्छा होती. यामध्ये तिला ज्युलिअस सीझरने मदत केली. तो हजारो रोमन सैनिकांसोबत इजिप्तमध्ये आला. सीझर आणि क्लिओपात्रा यांच्या भेटीने इतिहासाला एक अनोखे वळण दिले. तिच्याजागी तिचा सर्वात लहान भाऊ सिंहासनावर आला. पण त्याला विष पाजण्यात आले. क्लिओपात्रा हीच इजिप्तची एकमेव राणी बनली.



ज्युलियस सीझरची हत्या झाली तेव्हा क्लिओपात्रा रोमच्या दौऱ्यावर होती. ती विदेशी असल्यामुळे रोमन लोक तिला पसंत करत नव्हते. त्यामुळे तिला इजिप्तला परतावे लागले. तिथे तिचे आयुष्य फेरोसारखे अत्यंत वैभवात गेले.

ज्युलियस सीझरनंतर ऑक्टेव्हियस हा रोमचा सम्राट बनला. त्याचे सीझरचा मित्र मार्क ॲन्थनी या रोमन प्रशासकाशी वैर होते. सीझरच्या मृत्यूनंतर मार्कने इजिप्तला पलायन केले. त्यामुळे ऑक्टेव्हियसने इजिप्तविरुद्ध युद्ध घोषीत केले. तो सैनिकांनी भरलेल्या जहाजांचा ताफा घेऊन इजिप्तकडे निघाला.

मार्क ॲन्थनीकडेही अनेक जहाजे होती. त्याच्या ताफ्यात इजिप्तची जहाजे आल्यावर त्याचे पारडे ऑक्टेव्हियसपेक्षा भारी ठरले. आपल्या विजयाची खात्री वाटून तो लढायला तयार झाला.

मार्क ॲन्थनी हा ऑक्टोव्हीयसच्या तुलनेत अधिक चांगला सैनिक होता. ऑक्टेव्हियसशी जमिनीवर लढला असता तर कदाचित तो जिंकला असता. पण तो ऑक्टेव्हियसला आततायीपणे ग्रीसपासून दूर पश्चिमेला समुद्रात भिडला. तिथेही त्याची जिंकण्याची शक्यता होती. पण ऐनवेळी क्लिओपात्राने आपले जहाज अचानक इजिप्तच्या दिशेने हाकारले. तिच्या पाठीमागे इजिप्तची सारी जहाजे परतली. त्यामुळे मार्क हे युद्ध हरला. तो क्लिओपात्रासोबत इजिप्तला परतला.



ऑक्टेव्हियसच्या मनात अॅन्थनीला ठार करून इजिप्तला जिंकण्याची इच्छा होती. खरंतर या स्थितीतही अॅन्थनी त्याचा पराभव करू शकला असता. पण युद्धातून पळ काढल्यामुळे तो त्याच्या सैनिकांच्या मनातून उतरला होता.

निराश होऊन अॅन्थनीने आत्महत्या केली. ऑक्टेव्हियसने अलेक्झांड्रिया जिंकून घेतले. त्याची क्लिओपात्राशी भेट झाली. ती अजूनही खूप तरूण आणि सुंदर होती. इजिप्शियन दरबारातील ऐषोआरामात ती दंग होती.

क्लिओपात्रा अतिशय आकर्षक व चतुर स्त्री होती. ज्युलियस सीझर व मार्क अॅन्थनी या दोघांनाही तिने आपल्या बाजूने लढण्यासाठी मनवले होते. पण ती ऑक्टेव्हियसला मनवू शकली नाही. ऑक्टेव्हियस आपल्याला कैदी म्हणून रोमला घेऊन जाईल, असे वाटल्याने तिने आत्महत्या केली. असे म्हणतात की तिने फळांच्या टोपलीतून गुपचूप आणलेल्या विषारी सर्पाचा दंश स्वत:ला करून घेतला.

इजिप्तची ही महान संस्कृती पाच हजार वर्षे टिकली. “या संस्कृतीची मशाल भविष्यातील दूरदूरच्या पिढ्यांपर्यंत पेटत राहिली. मग ही मशाल पश्चिमेकडील लोकांपर्यंत पोहोचली,” असे या संस्कृतीबद्दल म्हटले जाते. म्हणूनच जेव्हा कधी तुम्ही कॅलेंडर बघाल, तेव्हा हजारो वर्षांपूर्वी इजिप्तच्या एका लेखनिकाच्या डोक्यातून ही कल्पना निघाली होती, हे लक्षात असू द्या.

**समाप्त**

